**श्रीमती गीता निशिकांत देशपांडे, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख (संलग्न), उपसंचालक भूमि अभिलेख, कोंकण प्रदेश, मुंबई यांची महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव येथील मुख्य प्रशासकीय अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने सेवा सुपूर्द करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : प्रतिनि-०२३/प्र.क्र.८१/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : १७ मे, २०२३.

वाचा: १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्या. १२, दि. १७.१२.२०१६.
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या.१२, दि. १४.०७.२०२१.
३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४०/कार्या. १२, दि. २८.०७.२०२१.
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.गोचिन-२०२३/प्र.क्र.२६/सां.का.१, दि. १७.०४.२०२३.

**शासन आदेश :**

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे) नियम, १९८१ मधील नियम ४० च्या परिशिष्ट-२ मधील विहित अटी व शर्तीना अधीन राहून संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयास अनुसरुन श्रीमती गीता निशिकांत देशपांडे, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख (संलग्न), उपसंचालक भूमि अभिलेख, कोंकण प्रदेश, मुंबई यांच्या सेवा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव (पू.), मुंबई येथील **मुख्य प्रशासकीय अधिकारी**, या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी तीन वर्षाच्या कालावधीकरीता सुपूर्द करण्यात येत आहेत.

**अ)** श्रीमती गीता निशिकांत देशपांडे, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख(संलग्न), उपसंचालक भूमि अभिलेख, कोंकण प्रदेश, मुंबई ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल त्यानंतर तीन वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन, त्यांच्या मूळ विभागात, ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

**ब)** जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

**क)** जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

**ड)** त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. श्रीमती गीता निशिकांत देशपांडे, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख (संलग्न),उपसंचालक भूमि अभिलेख, कोंकण प्रदेश, मुंबई यांनी संदर्भाधिन क्र. ४ येथील शासन निर्णयास अनुसरुन महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, गोरेगांव (पू.), मुंबई या कार्यालयातील **मुख्य प्रशासकीय अधिकारी** या

पदावर हजर होण्याकरीता जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्वरीत कार्यमुक्त करावे व श्रीमती देशपांडे यांनी उपरोक्त प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर झालेबाबतचा अहवाल या विभागास व पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०५१७१५३५१७६९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2023.05.17 15:36:49 +05'30'

**( संजय बनकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.

**प्रत:**

१) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
२) अप्पर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई-३२.
३) प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, दादासाहेब फाळके चित्रनगरी (फिल्मसिटी) गोरेगांव, मुंबई.
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७) श्रीमती गीता निशिकांत देशपांडे, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख (संलग्न), उपसंचालक भूमि अभिलेख, कोंकण प्रदेश, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, कार्यासन-सां.का.-१, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.